अर्थसंकल्पिय अनुदान सन २०१६-१७
मागणी क्रमांक एल -३, २५१५
इतर ग्राम विकास कार्यक्रम, १९८
ग्रामपंचायतींना साहाय्य (००)(०६)
महात्मा गांधी प्रतिष्ठान सेवाग्राम, वर्धा
यांच्या मालमत्ता करापोटी नुकसान भरपाई
म्हणून ग्रामपंचायतीस अनुदान
(२५१५ २४१२) ३१ सहायक अनुदाने

**महाराष्ट्र शासन**
**ग्रामविकास व जलसंधारण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बजेट - २०१६/प्र.क्र.१८४/पंरा-४**
बांधकाम भवन इमारत, २५ मर्झबान रोड,
फोर्ट, मुंबई - ४०० ००१
तारीख : २७ जानेवारी, २०१७

**वाचा :-** शासन निर्णय क्रमांकः बजेट २०१५/प्र.क्र.३१५/पंरा-४, दि. ११ मार्च, २०१६

**प्रस्तावना :-**

ग्रामपंचायत सेवाग्राम अंतर्गत महात्मा गांधी प्रतिष्ठान येथे बापुजींच्या सर्व कुट्या वगळून उत्पादक स्वरुपाच्या इमारती, यात्री निवास व कर्मचारी निवास यावर मालमत्ता कर लावण्यात आला आहे. संदर्भाधीन वाचा या शासन निर्णयान्वये महात्मा गांधी प्रतिष्ठान सेवाग्राम, वर्धा येथील बापूजींच्या सर्व कुट्या वगळून उत्पादक स्वरुपाच्या इमारती, यात्री निवास व कर्मचारी निवास यांना आकारण्यात येणाऱ्या मालमत्ता करास सवलत देण्यात आल्यामुळे ग्रामपंचायतीच्या मालमत्ता करापोटी होणाऱ्या नुकसानीची भरपाई म्हणून सन २००१-०२ या आर्थिक वर्षापासून ग्रामपंचायत सेवाग्राम, ता. जि. वर्धा यांना वित्तीय साहाय्य अदा करण्यासाठी अनुदान देण्यास मान्यता देण्यात आलेली आहे.

**शासन निर्णय :-**

महात्मा गांधी प्रतिष्ठान, सेवाग्राम, वर्धा यांच्या मालमत्ता करापोटी नुकसान भरपाई म्हणून ग्रामपंचायत सेवाग्रामला वित्तीय साहाय्य अदा करण्यासाठी सन २०१६-१७ या वित्तीय वर्षासाठी मागणी क्रमांक एल-३, प्रधानशीर्ष २५१५ इतर ग्राम विकास कार्यक्रम - १९८ - ग्रामपंचायतींना साहाय्य (००) (०६) महात्मा गांधी प्रतिष्ठान सेवाग्राम वर्धा यांच्या मालमत्ता करापोटी नुकसान भरपाई म्हणून ग्रामपंचायतीस अनुदान (२५१५ २४१२) - ३१ - सहायक अनुदान याखाली मंजूर करण्यात आलेला तसेच, अर्थसंकल्पिय

वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यात आलेला रक्कम रु. ३४,५११/- (अक्षरी रुपये चौतीस हजार पाचशे अकरा) एवढा निधी ग्रामपंचायत सेवाग्राम यांना अदा करण्यासाठी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, वर्धा यांना वितरित करण्यात येत आहे.

मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, वर्धा यांनी या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाची रक्कम ग्रामपंचायत सेवाग्राम यांचेकडे वितरीत करावी आणि वितरण आदेशाची प्रत शासनाकडे पाठवावी. सदर अनुदान याच कारणासाठी खर्च होईल याची दक्षता घ्यावी.

खर्चाचा मेळ घालण्यासाठी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, वर्धा यांनी खर्चाच्या विवरणपत्राबाबत महालेखापाल महाराष्ट्र १ व २ मुंबई/नागपूर या कार्यालयाशी ताळमेळाचे काम करावे व त्याबाबतचा अहवाल शासनास पाठवावा.

यासाठी होणारा खर्च मागणी क्रमांक एल-३, लेखाशिर्ष "२५१५ इतर ग्रामविकास कार्यक्रम, १९८ ग्राम पंचायतींना साहाय्य (००) (०६) महात्मा गांधी प्रतिष्ठान सेवाग्राम वर्धा यांच्या मालमत्ता करापोटी नुकसान भरपाई म्हणून ग्रामपंचायतीस अनुदान (२५१५ २४१२) (योजनेतर) ३१, सहायक अनुदाने." या लेखाशिर्षाखाली टाकण्यात यावा व तो उपरोक्त लेखाशिर्षाखाली सन २०१६-१७ या वित्तीय वर्षात मंजुर केलेल्या अर्थसंकल्पिय तरतुदीतून भागविण्यात यावा. हा निधी ज्या प्रयोजनासाठी देण्यात येतो त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्याची दक्षता घ्यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०१२७१२३७५१०३२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay R Bankar

Digitally signed by Sanjay R Bankar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=RDD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c8a7d6860ff227fd9e69a02e9ca5dfb2ccb25eda92d749629970f349fc6ed260, cn=Sanjay R Bankar
Date: 2017.01.27 15:01:20 +05'30'

**संजय बनकर**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२ मुंबई/नागपूर.

२. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२ मुंबई/नागपूर.

३. संचालक, लेखा व कोषागारे, नवीन प्रशासन भवन, मुंबई.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
६. विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर.
७. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, वर्धा.
८. उपायुक्त (आस्थापना), विभागीय आयुक्त कार्यालय,नागपूर.
९. उपायुक्त (विकास), विभागीय आयुक्त कार्यालय, नागपूर.
१०.जिल्हा कोषागार अधिकारी, वर्धा.
११.वित्त विभाग (कार्या. व्यय-१५/ अर्थ-१७),मंत्रालय, मुंबई.
१२.कार्यासन क्र.वित्त-१/ वित्त-७/ वित्त-८ व माहिती तंत्रज्ञान कक्ष, ग्रा.वि. व ज.सं. विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३.निवड नस्ती पंरा-४